**मे.लेझर टेलिसिस्टीम प्रा. लि. यांच्यासोबत केलेल्या दूरध्वनी यंत्रनेच्या देखभाल/दूरूस्ती विषयक करारास मुदतवाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिईएल-१०२४/प्र.क्र.४३/२०२४/निवास-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १० एप्रिल, २०२४

**संदर्भ:-** १) सा.प्र.वि. पत्र क्र. १०२१/प्र.क्र.३०/२२, दि.०६ जुलै,२०२१
२) सा.प्र.वि. पत्र क्र. १०२१/प्र.क्र.३०/२२, दि.२७ जुलै,२०२३

**प्रस्तावना:-**

मंत्रालयातील मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री महोदय यांची कार्यालय व मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री महोदय यांची शासकीय निवासस्थाने तसेच नागपूर येथे मा.मुख्यमंत्री/ उपमुख्यमंत्री यांची विधानभवनातील दालने व शासकीय निवासस्थाने येथील पॅनासोनिक दूरध्वनी यंत्रनेच्या देखभाल/दुरुस्ती साठी सा.प्र.वि. पत्र क्र. १०२१/प्र.क्र.३०/२२, दि.०६ जुलै,२०२१ नुसार मे. लेझर टेलिसिस्टीम प्रा.लि. यांच्यासोबत करण्यात आलेला आहे. तसेच सदर करारात सा.प्र.वि. पत्र क्र. १०२१/प्र.क्र.३०/२२, दि.२७ जुलै,२०२३ नुसार मुख्य सचिव यांचे कार्यालय व निवासस्थान, अपर मुख्य सचिव (सेवा), अपर मुख्य सचिव (प्र.सु.व र. व का.), अपर मुख्य सचिव (वि.चौ.अ. १), अपर मुख्य सचिव (विमान चालन) यांचे कार्यालयातील एकूण ०६ EPABX तसेच नागपूर येथील मुख्य सचिवांचे कार्यालय यांचा दरकरारात समावेश करण्यात आलेला आहे. सदर दरकरार दि.३१ मे,२०२४ रोजी संपुष्टात येणार आहे.

मे.लेझर टेलिसीस्टीम प्रा. लि. करारात केलेल्या दरात भाववाढ न करता करारानुसार विहीत केलेल्या दरात सेवा देण्यास तयार आहे. पॅनासोनिक दूरध्वनी यंत्रनेबाबत केलेल्या देखभाल/दुरूस्ती दरकराराच्या दरामध्येच NEC IPPBX या नविन खरेदी केलेल्या यंत्रनेचा सुद्धा देखभाल/दुरूस्ती करण्यास तयार असून सदर करारास मुदतवाढ देण्याबाबत मे.लेझर टेलिसीस्टीम प्रा. लि. यांनी शासनास विनंती केली आहे.

मा.मंत्री कार्यालयाला दूरध्वनी यंत्रनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी निविदेद्वारे सेवाप्रदात्याची निवड केल्यास शासन खर्चात वाढ होण्याची शक्यता आहे. उपरोक्त वस्तुस्थितीच्या अनुषंगाने शासनाची आर्थिक बचत होत असल्यामूळे सदर करारास एकवेळेची बाब म्हणुन मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाचा विचाराधीन होता. त्यानुषंगाने आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभागाने मे. लेझर टेलिसिस्टीम प्रा.लि. यांच्यासोबत (१०७ EPABX यंत्रनेबाबत) करार केला आहे. मा.उपमुख्यमंत्री (श्री. अजित पवार) यांच्या नविन मंत्रालयीन दालनातील (६ वा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय) दूरध्वनी यंत्रना व मा. उपमुख्यमंत्री (श्री. अजित पवार) यांच्या महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई येथील कार्यालयातील दूरध्वनी यंत्रनेचा (देखभाल व दुरूस्ती बाबत) समावेश दरकरारात करण्यात येत आहे. तसेच सदर दरकराराला दि. ३१ मे, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

मे. लेझर टेलिसिस्टीम प्रा.लि. यांच्यासोबत दूरध्वनी यंत्रनेच्या देखभाल व दुरुस्तीबाबत खालीलप्रमाणे दरपत्रक असेल.

| अ.क्र. | दूरध्वनी यंत्रणा,देखभाल/दुरुस्ती तसेच अनुषंगिक बाबींवर तपशिल | यंत्रणांची संख्या | प्रति यंत्रणा वार्षिक दर (रुपये) (जि.एस.टि वगळून) |
|---|---|---|---|
| १ | पॅनोसोनिक यंत्रणा ३X८ / NEC दूरध्वनी यंत्रना | ४ | रु.५,५४०/- |
| २ | पॅनोसोनिक यंत्रणा ६x१६ / NEC दूरध्वनी यंत्रना | ८८ | रु. ६,९००/- |
| ३ | पॅनोसोनिक यंत्रणा ८x२४ / NEC दूरध्वनी यंत्रना | ९ | रु. १४,९५०/- |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | पॅनोसोनिक यंत्रणा KX-TD१००( ३२X६४) / NEC दूरध्वनी यंत्रना | १ | रु.८२,९००/- |
| ५ | पॅनोसोनिक यंत्रणा IP Haibrid Digital Key Telephone System २४X६० & KX-३३३ / NEC दूरध्वनी यंत्रना | १ | रु.६७,५००/- |
| ६ | पॅनोसोनिक यंत्रणा KX-TD१००(८X२४) / NEC दूरध्वनी यंत्रना | १ | रु.६५,९७०/- |
| ७ | पॅनोसोनिक यंत्रणा KX-TD३००(८X४०) / NEC दूरध्वनी यंत्रना | ३ | रु.७०,०००/- |
| ८ | पॅनोसोनिक यंत्रणा KX-TD१००(१६X३२) / NEC दूरध्वनी यंत्रना | १ | रु.६५,९७०/- |
| ९ | पॅनोसोनिक यंत्रणा KX-TD१००(८X२४) / NEC दूरध्वनी यंत्रना | १ | रु.६५,९७०/- |
| १० | ५ पेअर पिव्हीसी टेलीफोन केबल प्रति मिटर | प्रति मिटर | रु. ३२/- |
| ११ | एक इंच पिव्हीसी केसिंग पट्टी प्रति मिटर | प्रति मिटर | रु. ३५/- |
| १२ | १० पेअर जेली आरमोड केबल प्रति मिटर | प्रति मिटर | रु. १२५/- |
| १३ | २० पेअर जेली आरमोड केबल प्रति मिटर | प्रति मिटर | रु. १७५/- |
| १४ | एमडीएफ ८x२४=८ ( with protection) | per unit | रु. ८२५०/- |
| १५ | Re-Installation and Commission Charges | per unit | रु. ३,०००/- |

३. सदर दरकराराला मुदतवाढ खालील अटी व शर्तीवर करण्यात येत आहे.

१) सदर यंत्रणा सुस्थितीत ठेवण्याची संपूर्ण जबाबदारी कंपनीची राहील.

२) करार कालावधीमध्ये दरात कोणतेही बदल कंपनीस करता येणार नाहीत.

३) दुरुस्ती/देखभाल दरकराराच्या रकमेची प्रतिपूर्ती अर्ध वार्षिक (Half Yearly) तत्वावर करण्यात यावी. तथापि त्याबाबत हमीपत्र शासनास सादर करावे.

४) यंत्रणा दुरूस्तीसाठी वापरण्यात येणारे सुटे भाग उच्च दर्जाचे/I.S.I मार्कचे असावेत.

५) करार कालावधीत सेवा असमाधानकारक आढळल्यास दुरुस्ती/देखभाल दरकरार रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

६) भविष्यात आवश्यकतेनुसार काही अटी व शर्ती समाविष्ट करावयाच्या झाल्यास तसे करण्याचा हक्क शासनास राहतील

७) शासनाशी केलेला करार मध्येच खंडीत करता येणार नाही.

८) प्रचलित नियमानुसार वस्तू व सेवा कर(जी.एस.टी.)आकारण्यात येईल

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०४१८१५१९०२४८०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEVIDAS SANDUJI BHAGURE

Digitally signed by DEVIDAS SANDUJI BHAGURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0990ae5e49835c85a735703503a82e3cd3cdde019c8ce2fdb9c7765ef1b7c39f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D19FEFD30011466572B4E69158C3099ADDED4CBB59D6833F72ED93F73A564DC, cn=DEVIDAS SANDUJI BHAGURE
Date: 2024.04.19 11:30:54 +05'30'

**( दे. सां. भगुरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ / २ (मुंबई / नागपूर)

२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) अवर सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) मे .लेझर टेलिसिस्टीम प्रा.लि., बी-३, नंदकिशोर इंडस्ट्रीयल इस्टेट, महाकाली गुंफा रोड, अंधेरी (पूर्व), मुंबई-४०००९३
६) निवडनस्ती.